नवनाथ भक्तिसार अध्याय सव्वीसावा

भर्तरी शोकावस्थेत आपल्या मातापित्याच्या स्मृतीत हरवून बसला असता व्यापाऱ्यांच्या एका तांड्याने त्याचे सांत्वन केले आणि स्वतःबरोबर चलण्याचा आग्रह केला. भर्तरी अल्पावधीतच त्या व्यापारी मंडळींचा आवडता झाला. भर्तरीला पशुपक्ष्यांची भाषा समजत असल्यामुळे केवळ कोल्हेकुई ऐकून त्याने व्यापाऱ्यांना येणाऱ्या संकटाची जाणीव करून दिली आणि त्याचमुळे व्यापाऱ्यांनी तस्करांचा हल्ला परतवून लावला पण त्याही पेक्षा म्हत्वाचे म्हणजे भर्तरीची जडण घडण घडत असताना अनेक शापित गंधर्व आपापल्या प्रक्तनातून मुक्त होणार होते हे सुद्धा विधिलिखित आणि परमेश्वराची अतर्क्य लीलाच होती. प्रस्तुत ग्रंथकर्त्यांनी अत्यंत कौशल्याने या शापित गंधर्वांचे उपकथानक सदर केले आहे. चित्रमा आणि सुरोचन यांच्या शापमुक्तीच्या उत्कंठावर्धक प्रसंगाची मांडणी, कथानकाची रंगत वाढवत आहे. गत अध्यायात गदर्भकायेत वावरणाऱ्या सुरोचन गंधर्वाने सत्यव्रत राजाची मथुरा नगरी ताम्रनगरी करून पण जिंकला. राजाने वचनानुसार राजकन्या सत्यवती कमठ कुंभाराकडे सुपूर्द केली.

राजाच्या विनंतीनुसार कमठ कुंभार आपली पत्नी आणि राजकन्या सत्यवतीसह गदर्भावर संसाराची गाठोडी लादून गर्द काळ्याकुट्ट अंधारात मथुरा नागरी बाहेर पडला. पुढे मजल दरमजल करीत अनेक दिवसानंतर अवंतिका नगरीत येऊन पोहोचला. कमठाने कुंभारवाड्यातल्या एका लहानशा घरात संसार थाटला. अंगणात लहानसे छप्पर उभारून त्यात खुंटीला गदर्भ बांधला. राजकुमारी सत्यवतीवर कन्येप्रमाणे माया करून तिचा सांभाळ करू लागला.

एक दिवस सत्यवती म्हणाली, “कमठ तातश्री, नियोजित पतीशी माझा विवाह करून द्यावा.” तिला होय मुली! अवश्य करून देईन.” असे उत्तर कमठाने दिले. मग त्या रात्री सामसूम झाल्यावर गदार्भाजवळ जाऊन तो म्हणाला, “महाराज! तुमच्या मनासारखे घडत आहे. राजकुमारी तुमच्याशी विवाह करण्याची इच्छा व्यक्त करीत आहे. आता पुढे काय करावे ते सांगा.” गदर्भ म्हणाला, “कमठराज! जननिंदेच्या भयाने उघडपणे मंगल विधी करणे योग्य वाटत नाही. तरी गुप्तता राखून राक्षस विवाह करू या.” कमठाला गंधर्वाचे म्हणणे रास्त वाटले. असे केल्याने सत्यव्रती महाराजांच्या अब्रूचे धिंडवडे जगजाहीर तरी होणार नाहीत याची खात्री आहे असे मत त्याने मनात व्यक्त केले. त्याने गदर्भास विचारले, “माझ्या एका शंकेचे आपण निरसन करा. तुम्ही गदर्भ देहात आहात आणि नाजूक कळीप्रमाणे भासणारी सत्यवती मनुष्य देहात आहे. अशा अवस्थेत आपल्या दोघांचा शरीर संबंध कसा होऊ शकतो?” “कमठजी आपण चिंता करू नये, राजकन्या सत्यवती ऋतुप्राप्ती होताच मला कळवा. त्याच्या चौथ्या दिवशी मी साक्षात रुपात प्रकट होऊन तिचा पत्नी म्हणून स्वीकार करीन आणि रतीक्रीडेने तिला तृप्त करीन.” ते ऐकून कमठाची चिंता दूर झाली. मग घरात येऊन सत्यवतीला म्हणाला, “मुली, ऋतुप्राप्तीच्या चतुर्थदिनी गंधर्वराज स्वतःच्या स्वरूपात प्रकट होऊन तुझ्याशी असुर विवाह करतील आणि तुझ्यासोबत रत होतील.” हे सांगून कमठ झोपण्यास गेला.

यथावकाश निसर्गनियमान्वये सत्यवती ऋतुमती झाली. चौथ्या दिवशी कमठाने ही गोष्ट गदर्भाच्या कानावर घातली. गदर्भाने त्याच क्षणी वेष बदलून गंधर्वरूप धारण केले. काय त्या रूपाचे वर्णन करावे? दिव्य, देखणे आणि अलौकिक स्वरूप! सूर्यच जणू सुवर्ण किरणांची वस्त्रे परिधान करून प्रकटला आहे. कमठाचे डोळेच दिपले. मनात म्हणू लागला, “माझ्यासारखा भाग्यशाली कुणीच नाही. साक्षात स्वर्गातील देवच माझ्या दारात चाकरी करीत आहे. खरं तर सत्यवतीसुद्धा महापुण्यवान आणि परमभाग्यशाली आहे म्हणून तर असा देव पती लाभला. अमृत घट, कुबेराचा खजिना

किंवा श्रीशिवाच्या माथ्यावरील चंद्राचे दृढ स्थान ह्या अप्राप्य वस्तू प्राप्त व्हाव्यात त्याप्रमाणे सत्यवतीला गंधर्वपती प्राप्त झाला आहे. लक्ष्मीनारायणासारखा जोड शोभून दिसतो आहे." अशा प्रकारच्या विचारातून भानावर येऊन कमठाने गंधर्वांच्या पायावर भक्तीभावाने डोके ठेवून नमन केले. मग सन्मानाने घरात नेले. सत्यवतीसमोर उभा राहून म्हणाला, "गंधर्वराज ही घ्या आपली कांता! सांभाळा तिला." अशा प्रकारे परिचय करून देऊन स्वतःच्या पत्नीसह बाहेर आला. त्या दोघांना एकांत मिळवून दिला.

सत्यवतीने षोडशोपचारे गंधर्वाचे पूजन केले. एकमेकांना पुष्पमाला घालून पती पत्नी म्हणून स्वीकार केला. त्यानंतर प्रेमालाप करीत मधुचंद्र साजरा केला. प्रारब्ध योगाने त्याच रात्री गर्भधारणा झाली. सुरोचानाने सत्यवतीला इंद्रशापाची कथा सांगितली व पुढे म्हणाले, "प्रिये सत्यवती! पुत्रसुख पाहिल्यानंतर मी स्वर्गात जाईन. तू येथे सुखात रहावे. तुझ्या पोटी जन्म घेणारा पुत्र, महापराक्रमी राजा 'विक्रमादित्य' म्हणून जगविख्यात होईल. धैर्यशाली, शककर्ता राजा म्हणून हजारो वर्षे किर्तीमान होईल. अशा पुत्र चूडामणीची तू माता होशील, तेव्हाच मी तुझ्या ऋणांतून मुक्त होईन. उरला प्रश्न शापमुक्तीचा तो पुत्रमुख पाहताच सुटणार आहे. मी पुनश्च स्वर्गसुखाची प्राप्ती करीन. परंतु मी स्वर्गात गेलो तर तू विरहाने व्याकूळ होऊ नयेस. विक्रमाचा सांभाळ करून त्याची चांगली जडण घडण तुझ्याकडून व्हावी, सुख समाधानाने रहावेस." सूर्योदयाची वेळ समीप आल्याने गंधर्व पुन्हा बाहेर येऊन गदर्भ झाला आणि नेहमीच्या जागी अंगणात उभा राहिला.

दिवसामागून दिवस जात होते. सत्यवतीच्या उदरातील गर्भ दिसामासांनी वाढत होता. गरोदरपणाची लक्षणे देहावर स्पष्ट दिसू लागली. ते पाहून आजूबाजूचे लोक कुंभार व कुंभारणीस विचारू लागले, "काय हो! ही सत्यवती तुमची कोण?" "अहो! आमची मुलगी आहे, गरोदर आहे म्हणून बाळंतपणासाठी माहेरी आणली आहे. बाळंत झाल्यावर पुन्हा सासरी जाईल." असे कुणालाही पटणारे उत्तर देऊन वेळ मारून नेत. विचारणाऱ्याचे शंकानिरसन होत असे. गर्भनिष्पत्ती काळ पूर्ण झाल्यावर नऊ महिने नऊ दिवसांनी एका शुभदिवशी शुभयोगातील समय, तिथी, नक्षत्र, करण, चंद्र तारका नक्षत्र, ग्रहबल आदींचा सुमुहूर्त साधत सत्यवती प्रसूत झाली. पित्याचा चेहरा असणारा तेजःपुंज, रूपवान, सुलक्षणी पुत्र जन्मला. ते नवजात बाळ म्हणजे जणू बाल सूर्यच म्हणून पाहुणा आला आहे असे वाटावे. प्रथेप्रमाणे सर्व संस्कार करून बाराव्या दिवशी त्याचे बारसे झाले. बाळाचे नाव 'विक्रमादित्य' ठेवले त्यानंतर एका शुभदिवशी गदर्भ देहाचा त्याग करून सुरोचन गंधर्व स्वरूपात प्रकट झाले. घरात जाऊन सत्यवतीजवळ बसले. डोळे भरून पुत्रमुख पहिले, बलाचा मुका घेतला. शापवाणी फिटून गेल्याचे अमरपुरीत इंद्राला जाणवले. गंधर्वाला स्वर्गात आण्यासाठी त्याने 'मातली' यांस पृथ्वीवर पाठविले. अवंतिकेमध्ये कमठाच्या घरसमोर मातली विमानसह उतरला. पुत्राशी खेळण्यात मग्न असलेल्या सुरोचनासमोर मातली उभा राहून हात जोडत म्हणाला, "सुरोचन गंधर्व महाराज! मी देवराज इंद्राच्या आदेशावरून आलो आहे. आपण शापमुक्त झाला आहात, चलावे! आता पुत्र मोह सोडून विमानात आरूढ व्हावे; इंद्र देव आपली प्रतीक्षा करीत आहेत." सुरोचन गंधर्वाने बाळाला सत्यवतीच्या मांडीवर ठेवून म्हणाले, "प्रिये! माझ्या प्रस्थानाची वेळ झाली. सुख समाधानात राहावे. बाळाला सांभाळ मला निघण्याची परवानगी दे." असे निरोपाचे बोल ऐकताच सत्यवतीला दुःखाचा उमाळा आला. "प्राणनाथ! चिमुकल्या बाळाला सोडून आपण कसे निघालात? तुम्ही गेल्यावर माझे इथे कोण आहे? बाळाला आणि मला असे परमुलुखात सोडून जाऊ नका." असे म्हणून सत्यवती रडू लागली, शोक अनावर झाला. "नाथा! तुमच्यासाठी माझे पिता कायमचे दुरावले. तुमच्यासाठी मी राज वैभव सोडून आले.

मातापित्यांना सोडून तुमची साथ स्वीकारली आणि आता तुम्हीही मला सोडून निघालात? मला असं दीनवाण्या अवस्थेत टाकून जाणे तुम्हाला शोभत नाही." गंधर्वाने तिला दृढ आलींगन दिले. तिचे आश्रू पुसले, तिच्या पाठीवरून, डोक्यावरून हात फिरवीत तिचे सांत्वन करीत म्हणाला, "सत्यवती! तू ज्या ज्या वेळी माझे स्मरण करशील त्या त्या वेळी मी धरणीवर उतरून तुला भेटेन असे वचन देतो मी. आता शोक आवरून शांत हो." असे तिचे सांत्वन करीत तिच्या दुःखाची दाहकता शांत केली. विमानात बसण्यापूर्वी कमठ कुंभाराच्या हातात सत्यवतीचा हात देऊन म्हणाला, "कमठजी, माझ्या काळजाचा घड तुमच्याजवळ ठेवून जात आहे, त्याचा सांभाळ करावा." असे बोलून विमानात आसनस्थ झाला. मालतीने सारथ्य केले. शापमुक्त होऊन सुरोचन गंधर्व पुन्हा इंद्रलोकात आला.

अवंतिकेत सत्यवती आणि सुरोचन गंधर्वाचा सुपुत्र विक्रम दिसामासांनी वाढत आहे. सात वर्षांचा कालावधी उलटला आहे. समवयस्क सवंगड्यांशी खेळत असतानाही त्याची सुप्तावस्थेमधली राजलक्षणे जाणवत आहेत. काळसुसंगत त्याच्या वृतीत, देहात, वागण्यात इष्ट ते बदल होत आहेत. बाराव्या वर्षी विद्याभ्यासाला सुरवात झाली. कठोर परिश्रम आणि कुशाग्र बुद्धीमत्ता यामुळे विद्या पारंगत झाला. शास्त्रविद्या, अश्वारोहण विद्यांचा आभ्यास करतांना राजसेवक आणि राजघराण्यातील व्यक्तींशी परिचय होऊन दाट स्नेहात रुपांतर झाले. विक्रमाला सर्वजण ओळखू लागले. सोळाव्या वर्षी तरूण वयात त्याला राजसेवेत सामावून घेण्यात आले. नगरीच्या महाद्वारावर पहारेकरी म्हणून त्याची नियुक्ती करण्यात आली. अथकपणे रात्र रात्र जागून त्याची गस्त चालू असे. हाच तो राजसेवक विक्रम, जो भर्तरीची भविष्यवाणी ऐकून अर्थात कोल्हेकुईच्या आवाजातील अर्थ जाणून व्यापाऱ्यांना सावध करताना धाडसी विक्रम स्वतःही सजग झाला. त्यावेळी नगरीच्या जवळ असलेल्या बाजार मैदानात हे व्यापारी मुक्कामास राहिले होते. त्यांची गुप्त खबर काढताना भर्तरीनाथांना पशूची भाषा कळत असून कोल्हेकुईचा अर्थ काय होता हे श्रवण करून राक्षस वधासाठी विक्रम निघाला आहे.

चित्रमा गंधर्वाची शापमुक्त होण्याची वेळ जवळ येऊन ठेपली असल्याने रडतखडत मार्गक्रमण करीत आहे. जराजर्जर आणि दुबळा झालेला चित्रमा जवळ येत आहे. त्याच्या हाताच्या मुठीत चार रत्ने आहेत. दबा धरून बसलेल्या खड्गनिपुण विक्रमाने चपळाईने त्याच्यावर हल्ला केला. मानेवर घाव घालताच राक्षसाचे मस्तक धडावेगळे होऊन खाली पडले, धडकन राक्षशी जमिनीवर आदळला आणि गतप्राण झाला. विक्रमाने त्याच्या रक्ताचा टिळा कपाळावर लावला. राक्षस देहातून प्रकाशझोत बाहेर निघाला आणि दिव्य देहधारी चित्रमा गंधर्व प्रकट झाला. मुक्तीदात्या विक्रमाला त्याने वंदन केले. त्याला घेण्यासाठी स्वर्गातून विमान उतरले. हा अलौकिक चमत्कार पाहून विस्मयचकित होऊन विक्रमाने विचारले, "दानावराज! आपणाला स्वर्गात नेण्यासाठी विमान आले आहे. आपण तर राक्षस आहात. आपणाला स्वर्गप्राप्ती कशी काय? हे फारच विपरीत आणि दुर्लभ वाटते." मग चित्रमाने कैलासावरील शिवपार्वतीच्या द्यूत क्रीडेपासूनचा इतिहास सांगून शापाची पार्श्वभूमी कथन केली. आपले नाव चित्रमा गंधर्व असल्याचे सांगून स्वस्थानी निघून गेले.

विक्रमाने राक्षस शवाची झडती घेतली असतां त्याच्या मुठीमध्ये चार मौल्यवान रत्ने मिळाली. ती पाहून त्याला अतिशय आनंद झाला. भर्तरीची वाणी तंतोतंत खरी ठरली होती. त्यामुळे तो फारच विस्मित होऊन स्वगतात म्हणाला, "धन्य धन्य भर्तरी! असा ज्ञानी पुरुष हमखास अवतारी असला पाहिजे. वृक्षांमध्ये कल्पतरू, पशुंमध्ये कामधेनु, रत्नांमध्ये चिंतामणी त्याप्रमाणे श्रेष्ठ मानवजातीमध्ये भर्तरी सर्वश्रेष्ठ आहे. असा श्रेष्ठोत्तम आपल्या सहवासात

असावा. त्याच्यामुळे त्रैलोकात आपली कीर्ती होणार आहे." अशा विचारांची आवर्तातच राक्षसाच्या रक्ताने आपले वस्त्र भिजवून नगरीच्या वेशीजवळ आला. विशीच्या महाद्वारावर पुन्हा स्वतःच्या कपाळावर विजयी टिळा लावला. भर्तरीने कथन केल्याप्रमाणे सर्व संस्कारविधी बिनचूकपणे पूर्ण करून झपाझप पावले टाकीत वेगाने व्यापाऱ्यांच्या तळाकडे निघाला.

नक्षत्रांच्या मेळाव्यांत चंद्रबिंब जसे शोभिवंत विझत असते, तसे त्या व्यापाऱ्यांच्या मेळाव्यांत भर्तरी बसला असताना तेजस्वी आणि शोभिवंत दिसत होता. वक्रम येत असल्याची चाहूल लागताच व्यापाऱ्यांनी सावधपणा दाखवीत, "कोण आहेस तू? परिचय द्यावा, अन्यथा शिक्षा भोगावी लागले." विक्रम म्हणाला, "व्यापारी बंधुंनो! मी राजसेवक आहे. ग्राम रक्षकाचे काम करतो, पहारा करण्यासाठी गस्त घालीत असताना तुमच्या गोष्टी ऐकून आलो." व्यापारी विचाराते झाले, "कोणत्या गोष्टी? कशा काय ऐकल्या?" "पहाऱ्याचे कर्तव्य बजावत असताना मी तुमच्या जवळपास वावरत होतो. तेव्हा तुमचा आवाज स्पष्टपणे ऐकला. तुमच्यावर तस्करांनी हल्ला केला, पण तुम्हाला पूर्वकल्पना असल्यामुळे तुम्ही तीव्र प्रतिकार करून स्वतःचा बचाव केलात. ही पूर्वसूचना कशी मिळाली ते सांगा. आपल्यावर धाड पडल्याचे महाराजांना समजले असून जाबजबाब, चौकशी करण्याची आज्ञा केली आहे. त्याचबरोबर काही नुकसान झाले असल्यास भरपाई देण्याचा आदेश झाला आहे. तरी सत्य कथन करावे. त्याप्रमाणे महाराज निवाडा करतील. सांगा बरे किती दरोडेखोर होते? दरोडेखोर येणार असल्याचे तुम्हाला कसे कळले आणि कोणी कळविले? व्यापाऱ्यांतील एका ज्येष्ठाने त्या प्रश्नांच्या अनुषंगाने सारांशात सांगितले, "अंधाऱ्या रात्री आम्ही शेकोटी पेटवून गारठ्यापासून संरक्षण करीत होतो. तेव्हा कोल्हेकुईची हुल्लड ऐकली. आमचा साथीदार भर्तरी म्हणाला मला पशू पक्ष्यांची भाषा कळते. हे कोल्हे म्हणतात की व्यापाऱ्यांनी बेसावध राहू नये, आज मध्य रात्री तस्कर त्यांच्यावर हल्ला करणार आहेत, भर्तरीच्या ह्या समय सुचकतेमुळे आम्ही प्रतिकाराची जय्यत तयारी ठेवली आणि तस्करांना पळवून लावले." असे सांगून त्याने भर्तरीकडे विक्रमाचे लक्ष वेधले. अशाप्रकारे विक्रम भर्तरीची ओळख झाली. बराच वेळ तो भर्तरीशी खेळीमेळीने चर्चा करीत होता. नंतर उठून वेशीजवळच्या जकात नाक्यावर आला. त्याला तेथे जकात अधिकारी भेटला. विक्रमाने अडवून त्याला विनंती केली, "नगरी बाहेर जे व्यापारी आले आहेत, त्यांच्या जकातीचा जो काही हिशोब असेल त्याची तिप्पट रक्कम मी आपणाला देईन. आपण त्यांच्यातील भर्तरी नावाच्या तरुणास मागून घावे. तो माझा धाकटा भाऊ आहे. या अलग विलग चाकऱ्यामुळे, मी येथे आणि तो व्यापाऱ्यांच्या बरोबर भटकत असतो. तरी आमचा मिलाफ केल्यास आपणास पुण्य मिळेल.

मृत जिवंत व्हावा, तसा तीनपट जादा पैसे मिळणार हे ऐकल्यावर द्रव्यलोभी जकात अधिकारी खडबडून जागा झाला. एवढी मोठी रक्कम एकाच फटक्यात प्राप्त झाल्यास चंगळच होणार याने तो अधिकारी सुखावला. धनामुळे सुख मिळेल असे वाटते परंतु धन नरकाचे द्वार उघडून नरकवास घडवते. सुसंगतीने किंवा कुसंगतीने कसाही धनाचा खेळ खेळला तरी गळयाला फास आवळलाच जातो. इष्ट आणि अनिष्ट या नाण्याच्या दोन बाजू आहेत. विक्रमाच्या बोलण्याने तोंडाला पाणी सुटलेला जकात अधिकारी म्हणाला, 'ठीक आहे, विक्रमा, मी तुझे काम करीन." जकात अधिकारी त्याच्या कार्यालयातील आसनावर जाऊन बसला. नोकराकरवी व्यापाऱ्यांना बोलाविले. गोण्यामधला माल तपासून मोजदाद केली. हिशोब प्रमाणे व्यापाऱ्यांनी मालाची जकात भरली. जकात अधिकाऱ्यांनी व्यापाऱ्यांना विचारले, "अरे व्यापाऱ्यांनो! तुमच्यामध्ये भर्तरी कोण आहे?" "आहे एक अनाथ तरुण आमच्याबरोबर!" "त्याला बोलवा बरं! मला बघू द्या!!"

व्यापाऱ्यांनी भर्तरीला बोलावून आणले. त्याचे निरागस आणि देखणे रूप पाहून जकात अधिकाऱ्यालाही, हा इथेच राहावा असेच वाटले. मग तो व्यापारी प्रमुखाला एकांतात घेऊन म्हणाला, “वैश्यनायक! मी तुमची जकात माफ करून तुमचे पैसे तुम्हाला परत देतो, तुम्ही पाहिजे तेवढा माल भरून आणा. रस्त्यात येताना कुणी अडवले तर माझे नाव सांगा. तोपर्यंत या पोत्यांजवळ भर्तरीला ठेवून जा, आम्ही रक्षण करू.” मग सर्वांच्या विचाराने व्यापाऱ्यांचा प्रतिनिधी म्हणून भर्तरीने तेथे राहण्याचे काबुल केले. व्यापाऱ्यांनी आपला हक्काचा माणूस म्हणून भर्तरीला जकात नाक्यावर ठेवला. व्यापार करून सर्वजण पुढच्या फेरीसाठी रवाना झाले. त्या उतावळया जकात अधिकाऱ्याने जकातीच्या भरणा रकमेचा तिप्पट हिशोब करून विक्रमास निरोप दिला. “विक्रमा, ही तिप्पट रक्कम झाली आहे. त्वरेने घेऊन येणे.” विक्रमाने सांगितले की आपली रक्कम संध्याकाळपर्यंत देतो. दरम्यानच्या काळात हे एक रत्न गहाण म्हणून आपल्याकडे ठेवा. “ठीक आहे” असे म्हणून अधिकाऱ्यांने ते रत्न आपल्याकडे ठेवून घेतले.

विक्रमाने भर्तरीशी सलगी वाढवली, भर्तरीला जेवण खाण देऊ लागला. पुढे काही दिवसांनी व्यापारी पुन्हा आले. तेव्हा त्यांना भर्तरीचा चांगला उपयोग झाला. मग ते विक्रमाला म्हणाले, “याच्या खानावळीचे पैसे आम्ही देऊ याची तुमच्या घरी जेवणाची, रहाण्याची व्यवस्था करावी.” विक्रमाने मोठ्या आनंदाने भर्तरीला राहण्यासाठी आपल्या घरी नेले. मातोश्री सत्यवतीला भर्तरीचा सर्व पूर्व इतिहास सांगितला. त्याच्या पशु पक्षी यांच्या भाषाज्ञानाचीही माहिती सांगितली. भर्तरीबद्दल विक्रम म्हणाला, “मातोश्री! माझ्यापेक्षा भर्तरीची अधिक काळजी घ्यावी. तो अवतारी पुरुष असून माझे पाठच्या भावासारखे रक्षण करील. हा तुझा द्‌वितीय पुत्रच समजावा. अणुरेणु इतकाही फरक न करता आमच्यावर मायेची पाखर घाल. त्याचे मन दुखवू नको.” मग मातेने दोघांना भोजन घातले.

अशा प्रकारे रोज येणे जाणे, वास्तव्य सहवासाने भर्तरी हा परका न राहता त्यांच्यातील एक सदस्य किंवा कौटुंबिक घटक ठरला. सत्यवतीमातेने त्याला सख्ख्या पुत्राएवढा जीव लावला. वनातली हरिणी कशी ममता करीत होती तशी सत्यवती माया करू लागली. तिला दुसरा पुत्र भेटला होता आणि भर्तरीला तिसऱ्या वेळी मातृछत्र मिळाले होते.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने गोहत्येचे पाप नष्ट होऊन शत्रू नाहीसे होतील.